अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, धाराशिव यांच्या अधिनस्त कार्यालयाकरिता ०५ निर्लेखित निरीक्षण वाहनांच्या बदली ०५ नवीन निरीक्षण वाहन खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक बांधकाम विभाग
### शासन निर्णय क्र.वाहन २०२४ / प्र.क्र.२० / यंबांसा

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- २० फेब्रुवारी, २०२५

वाचा :-

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.वाहन २०१७/प्र.क्र.४१/१७/विनियम, दि.२८ जुलै, २०२० व दि.०२ फेब्रुवारी, २०२४.
२) उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दि.१ डिसेंबर, २०१६.
३) उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दि.२४ ऑगस्ट, २०१७.
४) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, छत्रपती संभाजीनगर यांचा जा.क्रमांक : मुअऔ/का-६/यांत्रिकी/११९१, दि.०५ मार्च, २०२४ रोजीचा प्रस्ताव

प्रस्तावना :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, छत्रपती संभाजीनगर यांच्या जा.क्रमांक : मुअऔ/का-६/यांत्रिकी/११९१, दि.०५ मार्च, २०२४ रोजीच्या पत्रान्वये अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, धाराशिव या क्षेत्रिय कार्यालयाच्या अधीनस्त कार्यालयांच्या वापरातील निर्लेखित निरीक्षण वाहनांच्या बदली नवीन निरीक्षण वाहन खरेदीचा प्रस्ताव प्राप्त झाला आहे. वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयान्वये, निर्लेखित केलेल्या एकूण ०५ निरीक्षण वाहनाच्या (१ कार व ४ जीप) बदली ०५ नवीन निरीक्षण वाहनाच्या (१ कार व ४ जीप) खरेदीच्या प्रस्तावास प्रशासकीय मंजुरी देण्याबाबत संदर्भाधीन क्रमांक ४ येथील पत्रान्वये प्रस्तावित केले आहे. त्यानुसार नवीन निरीक्षण वाहनांच्या खरेदीचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय :-

क्षेत्रीय कार्यालयाची निरीक्षण वाहनांच्या अभावी होणारी गैरसोय लक्षात घेता, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखालील अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,

धाराशिव या क्षेत्रिय कार्यालयाच्या अधीनस्त कार्यालयांच्या वापरातील ०५ निर्लेखित निरीक्षण वाहनांच्या (१ कार व ४ जीप) बदली ०५ नवीन निरीक्षण वाहन (१ कार व ४ जीप) प्रति वाहन रू.८.०० लक्ष या वाहन खरेदीसाठीच्या किंमत मर्यादेत खरेदी करण्यात येईल. या निश्चित करण्यात आलेल्या वाहन किंमत मर्यादेत वस्तू व सेवा कराचा अंतर्भाव करण्यात येणार नाही. तथापि, सदर किंमतीमध्ये वाहनाच्या किंमतीसोबत टेम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस व सहाय्यभुत साहित्य (Accessories) इत्यादीसाठीच्या खर्चाचा अंतर्भाव करण्यात यावा. निधी उपलब्धतेच्या व विहित कार्यपध्दतीच्या अवलंब करून वाहने खरेदी करण्याच्या अटीच्या अधीन खरेदीस राज्य स्तरीय वाहन आढावा समितीने मान्यता दिली आहे. राज्यस्तरीय वाहन आढावा समितीने दिलेल्या मान्यतेस अनुसरून विभागाकडे उपलब्ध असलेल्या अनुदानातून अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, धाराशिव या क्षेत्रिय कार्यालयास ०५ निर्लेखित निरीक्षण वाहनाच्या बदली ०५ नवीन निरीक्षण वाहनाच्या खरेदीकरिता रु. ५१,२०,०००/- (रुपये एकावन्न लक्ष वीस हजार मात्र) इतक्या निधीस पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**<u>अटी व शर्ती :-</u>**

१) वित्त विभागाच्या उक्त वाचा येथील क्र.१ च्या शासन निर्णयामधील अटींनुसार ०५ निर्लेखित केलेल्या निरीक्षण वाहनांच्या (१ कार व ४ जीप) बदली त्याच प्रकारची (कार ऐवजी कार व जीप ऐवजी जीप) ०५ नवीन निरीक्षण वाहन, प्रति वाहन खरेदीच्या रू.८.०० लक्ष या वाहन खरेदीसाठीच्या किंमत मर्यादेत खरेदी करण्यात यावी. तसेच वित्त विभागाच्या दि.२/२/२०२४ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.२ मध्ये " निश्चित करण्यात आलेल्या वाहन किंमत मर्यादेत वस्तू व कराचा अंतर्भाव करण्यात आलेला नाही. तथापि, सदर किंमतीमध्ये वाहनाच्या किंमतीसोबत टेंम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस व सहाय्यभूत साहित्य (Accessories) इत्यादीसाठीच्या खर्चाचा अंतर्भाव करण्यात आलेला आहे. सबब, निरीक्षण वाहन खरेदी करतांना त्यावर २८ टक्के इतका वस्तू व सेवा कर (GST & SGST) आकरला जातो. उपरोक्त शासन निर्णयातील तरतूद विचारात घेता, रू.८,००,०००/- इतकी वाहनाची किंमत (किंमत+टेंम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस+सहाय्यभूत साहित्य) व त्यासोबत २८ टक्के वस्तू व सेवा कराची (१४ % GST + १४% SGST ) रक्कम रू.२,२४,०००/- अशी एकूण रू.१०,२४,०००/- इतकी प्रति वाहन रक्कम मंजूर करण्यात येत आहे.

२) प्रस्तावित निर्लेखित केलेल्या निरीक्षण वाहनांच्या बदली नवीन निरीक्षण वाहनांची खरेदी उद्योग ऊर्जा व कामगार विभागाच्या वाचा क्र.२ व ३ येथील दि.०१.१२.२०१६ तसेच दि.२४.०८.२०१७ च्या शासन निर्णयानुसार GeM Portal वरुन विहीत पध्दतीचा अवलंब करुन करण्यात यावी.

३) प्रस्तावित निर्लेखित निरीक्षण वाहनांच्या बदली यापूर्वी नवीन निरीक्षण वाहने खरेदी करण्यात आलेली नसल्याची खात्री करावी.

४) वाहन अनुज्ञेय असणाऱ्या एका अधिकाऱ्याच्या वापरात फक्त एकच वाहन असावे.

५) नवीन निरीक्षण वाहने खरेदीनंतर जुन्या वाहनांची नोंद महावाहन संगणक प्रणालीवरुन नष्ट करुन त्या बदली नवीन वाहनांची नोंद महावाहन संगणक प्रणालीवर नोंदविण्यात यावी.

६) वरीलप्रमाणे नवीन निरीक्षण वाहने खरेदी करताना उक्त वाचा क्र.१, २ व ३ येथील वित्त विभाग व उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या शासन निर्णयाचे कटाक्षाने पालन करण्यात यावे.

७) निरीक्षण वाहनांची खरेदी वित्त विभागाच्या दि.१०.०१.२०११ च्या शासन निर्णयातील अटींच्या अधीन राहून अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, धाराशिव यांनी मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, छत्रपती संभाजीनगर यांच्या मान्यतेने करावी.

८) उपरोक्त अनु.क्र.१ ते ७ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची, खरेदी नियमानुसार व आवश्यकतेप्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची तसेच वाहनांच्या वाटपाची संपूर्ण जबाबदारी अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, कोकण भवन, नवी मुंबई यांची राहील.

२. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, धाराशिव यांच्या अधीनस्त क्षेत्रिय कार्यालयासाठी ०५ नवीन निरीक्षण वाहनांच्या खरेदीकरीता लागणारा रु. ५१,२०,०००/- (रुपये एकावन्न लक्ष वीस हजार मात्र) इतका निधी मागणी क्र. एच-६, २०५९-सार्वजनिक बांधकामे, ८०-सर्वसाधारण, ०५२ - यंत्रसामुग्री व साधनसामुग्री, (००) (०१) दुरुस्त्या व वाहन अनिवार्य (२०५९ २११६) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२६/२०२५/विनियम, दि.२१.०१.२०२५ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०२२०१५४०००२५१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SACHIN MANIKRAO CHIVATE

Digitally signed by SACHIN MANIKRAO CHIVATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=e51dff58ad80dfdae3976edee46d1bf7934d01469cb4d916976c25305666b613, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=40AE84322C80D3E4EA1B574EB3782ED6CB133B938933BDF197ED5A1551D8622A, cn=SACHIN MANIKRAO CHIVATE
Date: 2025.02.20 15:40:57 +05'30'

**( सचिन चिवटे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**सहपत्र : विवरणपत्र-अ**

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,

२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,

३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

४) स्वीय सहायक अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,

५) स्वीय सहायक, सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,

६) स्वीय सहायक, सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,

७) स्वीय सहायक, उप सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,

८) स्वीय सहायक, आंतर वित्तीय सल्लागार तथा उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,

९) मुख्य अभियंता,सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, छत्रपती संभाजीनगर,

१०) अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, कोकण भवन,नवी मुंबई,

११) सहायक मुख्य अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, छत्रपती संभाजीनगर,

१२) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, धाराशिव,

१३) वित्त विभाग (विनियम/व्यय-११/अर्थ-१२), मंत्रालय, मुंबई,

१४) कार्यासन अधिकारी, अर्थ-३, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,

१५) निवड नस्ती.

शासन निर्णय क्र.वाहन २०२४/प्र.क्र.२०/यंबांसा, दि. २० फेब्रुवारी, २०२५ सोबतचे

**विवरण पत्र- "अ" (०१ कार व ०४ जीप )(एक कार व चार जीप)**

**निर्लेखित निरीक्षण वाहनाचे बदली नवीन निरीक्षण वाहनाचे खरेदी सोबत प्रस्ताव**

| अ.क्र. | सा.बां.मंडळाचे नांव | सा.बां.विभागाचे नांव | वाहनाचा प्रकार | निर्लेखित वाहनाचा क्रमांक |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| **अ)** | **मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, छत्रपती संभाजीनगर** | | | |
| **१)** | **अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, धाराशिव** | | | |
| १ | | कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, धाराशिव (उस्मानाबाद) | कार | एमएच-२४-डी- ७६२० |
| २ | | उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग (इमारती), धारशिव (उस्मानाबाद) | जीप | एमएच-०४-एएन-००७८ |
| ३ | | उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, परंडा | जीप | एमएच-२५-६१५४ |
| ४ | | उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम, उपविभाग,वाशी | जीप | एमएच-२५-सी-६२०६ |
| ५ | | उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, कळंब | जीप | एमएच-२५-सी-६३४५ |